कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम
रायगड जिल्हयातील कामांना प्रशासकीय
मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व पंचायत राज विभाग
शासन निर्णय क्र. कोग्रापविका-२०२२/प्र.क्र.६१/ योजना-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक : ३० मार्च, २०२२.

संदर्भ:

१) ग्रामविकास विभाग,शासन निर्णय क्र. कोवियो-२०१५/प्र.क्र.७५/योजना-६, दि. २३/११/२०१५.

२) ग्रामविकास व पंचायतराज विभाग: क्र:ग्रासयो-२०१५/प्र.क्र.७५/यो-६, दि.२९/०७/२०२०.

३) जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यांचे क्र. नियोजन /कार्या-५/को.ग्रा.प./प्रस्ताव/२९७/२०२१ दि. ०२/०२/२०२२ रोजीचे पत्र.

प्रस्तावना :-

कोकणातील ग्रामीण भागातील भुमीपुत्रांना त्यांच्या गावात रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टिने तसेच कोकणातील विकास कामांची गती वाढविणे या करीता ग्रामीण भागातील पर्यटनाला चालना देण्यासाठी, पर्यटनाचा विकास होणाऱ्या गावांमध्ये पर्यटनासाठी पायाभुत सुविधा निर्माण करणे व पर्यायाने गावांचा विकास करणे या उद्देशाने राज्य शासनाने “कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम” ही योजना संदर्भिय शासननिर्णय क्र. ०१ अन्वये घोषित केली आहे. या शासननिर्णयास अनुसरून जिल्हाधिकारी, रायगड यांच्याकडून राज्यस्तरीय समिती कोंकण ग्रामीण पर्यटन विकास योजनेतर्गत मान्यतेसाठी सन २०२१-२२ करिता सादर केलेल्या प्रस्तावांना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातर्गत संदर्भिय दि.२३/११/२०१५ व दि. २९/७/२०२० रोजीच्या शासननिर्णयातील तरतूदींनुसार जिल्हाधिकारी, रायगड यांच्या कार्यालयाकडून सादर झालेल्या विकास कामांना सोबतच्या परिशिष्ट क्र. ०१ मधील यादीत नमूद कामांना शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम ( २५१५ २४३२) ३१ सहायक अनुदान या योजनेअंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या निधीतून सदर कामांना निधी वितरीत करण्यात येईल. सदर अर्थसंकल्पिय तरतूदीतून रू.३,००,००,०००/- (रू. तीन कोटी फक्त) इतक्या रक्कमेच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांनी सदर निधी वितरीत करताना संदर्भाधिन क्रमांक १ व २ मधील शासन निर्णयात नमूद केलेल्या व शर्तीचे पालन करावे.

३. वरील बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. एल-३ मुख्य लेखाशिर्ष मागणी-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम (००) (०७) कोंकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर )- (२५१५-२४३२)) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या पुढील वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर कामे इतर कोणत्याही योजनेतून घेण्यात आलेले नाही यांची मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांनी खात्री करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करूण्यात आला असून त्याचा संकेतांक संकेताक **२०२२०३३११०९५४२१४३२०** हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

EKNATH
KASHINATH
GAGARE

Digitally signed by EKNATH KASHINATH GAGARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=d9a3ccbc053d2cf9b4c30c85bb8db0e6c39331b90d48b0aba6cde387b5ec208c,
pseudonym=E827291D35E203B1202123927394AD71E06D8BCA,
serialNumber=6BC79F4A08CA2D5D74E02E7214F6AAD4EF7D9AFDEBA5BFCDEF24D45049099939, cn=EKNATH KASHINATH GAGARE
Date: 2022.03.31 17:21:43 +05'30'

**(एकनाथ गागरे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय,मुंबई.
२) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
३) मुख्य वास्तुविशारद,सां.बां.वि., बांधकाम भवन, मुंबई.
४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई.
५) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई.
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुबंई.
७) जिल्हाधिकारी, रायगड.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
९) उपसचिव, पर्यटन मंत्रालय, मुबंई.
१०) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड.
१२) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, रायगड.

१३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग , रायगड.

१४) मा. मंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

१५) मा. राज्यमंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

१६) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.

१७) निवडनस्ती, कार्यासन योजना-६.

**ग्रामविकास विभाग,शासन निर्णय क्र. कोग्रापवि-२०२२/प्र.क्र.६१/यो-६, दि. ३०/३/२०२२ चे सहपत्र**

**परिशिष्ट-१**

| अ.क्र. | तालुका | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम (रु.लाखात) |
|---|---|---|---|
| १ | रोहा | पेशवेकालीन गणपती मंदिर पिंगळसई सुशोभिकरण करणे | २०.०० |
| २ | | वराठी धावीर मंदिर शेजारील संरक्षण भिंत बांधणे. | १५.०० |
| ३ | | जननीदेवी मंदिर तिसे रस्ता तयार करणे | २०.०० |
| ४ | | वाशी महादेव वाडी भवानी मंदिर सुशोभिकरण करणे | १०.०० |
| ५ | | महादेवाडी येथे गणेश मंदिर सुशोभिकरण करणे | १०.०० |
| ६ | | कारिवणे आदिवासी ठाकूरवाडी येथे गणपती मंदिर सुशोभिकरण करणे | ७.०० |
| ७ | | वाली येथे गाव मंदिर सुशोभिकरण करणे | २०.०० |
| ८. | श्रीवर्धन | देवखोल कुसमेश्वर मंदिर सुशोभिकरण करणे | १५.०० |
| ९ | | दिवेआगर येथे मुस्लिम समाज जनाजा रस्ता तयार करणे | १०.०० |
| १० | | दिवेआगर येथे विश्वास मांजरेकर ते मुस्लिम समाज घराकडे जाणारा रस्ता तयार करणे | १०.०० |
| ११ | माणगाव | वावेदिवाळी कालिकामाता मंदिर सुशोभिकरण करणे | १५.०० |
| १२ | | मौजे पाणसई येथे श्री. विठ्ठल रुक्मीणी मंदिरासमोरील संरक्षक भिंत व सभामंडप बांधणे | ८.०० |
| १३ | | उमरोली शिवमंदिर परिसर सुधारणा करणे | ८.०० |
| १४ | | तिलोरे खंडोबा देवस्थान परिसर सुशोभिकरण करणे | २०.०० |
| १५ | मुरूड | काशिद बीचवर पथदिवे व काशिद, सर्व, चिकणी रस्त्याला पथदिवे (सौरऊर्जा) बसविणेबाबत | १५.०० |
| १६ | | प्राचीन वोघाबा मंदिर, नांदगाव येथे परिसर सुशोभिकरण करणे | १०.०० |
| १७ | तळा | मौजे तांबडी येथे मानादेवी मंदिराकडे जाणारा ६००.०० मी चा नविन रस्ता डांबरीकरण करणे. | १०.०० |
| १८ | | मौजे कमळशेत येथे सोमजाई मंदिर सभागृहासाठी निधी | १०.०० |
| १९ | महाड | पंचक्रोशी कोथेर येथे सोमजाई मंदिरासमोर सभामंडप बांधणे | १०.०० |
| २० | पोलादपूर | मौजे करंजे येथे गावाच्या मंदिराच्या जिर्णोध्दाराच्या कामाकरीता निधी | १०.०० |
| २१ | पेण | श्रीगणेशनाथ महाराज संस्थान खारपाले येथे भक्तनिवास बांधणे | १०.०० |
| २२ | म्हसळा | हरकोल जैन समाज (क वर्ग श्रेणी) रस्ता तयार करणे | १०.०० |
| २३ | | वारळ दत्तमंदिराकडे जाणारा रस्ता तयार करणे | १०.०० |
| २४ | | तोंडसुरे येथे प्राचीन मंदिर सुशोभिकरण करणे | १२.०० |
| २५ | | पेढांबे येथे प्राचीन मंदिर सुधारणा करणे | ५.०० |
| | | **एकूण रक्कम** | **३००.००** |